गोपनीय

फौजदारी आरोपाखाली दोषी ठरलेल्या शासकीय सेवकांच्या प्रकरणात करावयाची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

क्रमांक : सीडीआर-१०९२/६६२/प्रकरण-४४/९२/अकरा, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २९ डिसेंबर १९९२.

**परिपत्रक**

फौजदारी आरोपाखाली दोषी ठरलेल्या शासकीय सेवकांविरुद्ध करावयाच्या कार्यवाहीबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-१०८२/३३६२/६९/अकरा, दिनांक १२ जून १९८६ अन्वये सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्याद्वारे असे स्पष्टपणे विहीत करण्यात आले आहे की, एखाद्या प्रकरणात न्यायालयाने शिक्षा दिलेल्या शासकीय सेवकांच्या आरोपांचे स्वरूप पाहता त्याला यापुढे सार्वजनिक सेवेत राहू देणे सकृतदर्शनी अनिष्ट ठरत असले तर, अशा कर्मचाऱ्यास शासन सेवेतून सक्तीने सेवानिवृत्त, सेवेतून कमी अथवा बडतर्फ करण्यात यावे. अशा वेळी त्या शिक्षेविरुद्ध अपील करण्याचा कालावधी समाप्त होण्याची अथवा अपील दाखल केले असल्यास प्रथम अपील न्यायालयाच्या निकालाची वाट पाहण्याची आवश्यकता नाही. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, ह्या सूचना काटेकोरपणे अनुसरल्या जात नाहीत. परिणामी, शासकीय कर्मचाऱ्यांना शिक्षा झाल्यानंतरही प्रथम अपील न्यायालयाच्या निकालाची प्रतीक्षा करीत असताना नेहमीच्या दराने निर्वाह भत्ता मंजूर केला जातो. अशा अनेक प्रकरणात कर्मचाऱ्यांच्या सेवेचा लाभ न घेता, त्यांना वाढीव दराने, त्यांच्या वित्तलब्धीच्या ८० ते ८५ टक्के एवढा निर्वाह भत्ता द्यावा लागल्याने शासनाचे नुकसान होते.

२. ज्या प्रकरणामध्ये सक्षम प्राधिकाऱ्यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-१०८२/३३६२/६९/अकरा, दिनांक १२ जून १९८६ मधील सूचनांचे पालन केले नसल्याचे आढळून येईल. अशा प्राधिकाऱ्यांच्या प्रमादांची गंभीर दखल घेण्यात यावी. तसेच ह्या परिपत्रकातील सूचनांचे पालन शिस्तभंग विषयक प्राधिकाऱ्यांनी केलेले नाही असे नियमित तपासणीच्या वेळी पर्यवेक्षी प्राधिकाऱ्यांना आढळून आल्यास त्यांनी संबंधित शिस्तभंग विषयक प्राधिकाऱ्यांच्या प्रमादांची गंभीर दखल घ्यावी आणि त्यांच्याविरुद्ध उचित कार्यवाही करावी.

३. उपर्युक्त परिपत्रकात असेही विहित करण्यात आले आहे की, शासकीय कर्मचाऱ्यावर शिक्षा बजावण्यापूर्वी त्याला कारणे दाखवा नोटीस देण्याची आवश्यकता नाही. महाराष्ट्र नागरी सेवा (शि. व अ.) नियम, १९७९ मधील नियम, १३ (एक) शासन अधिसूचना क्रमांक-सीडीआर-११८८/१५९२/सीआर-३८/८८/अकरा, दिनांक १२ ऑक्टोबर १९९० अन्वये सुधारित करण्यात आली असून प्रस्तावित शिक्षा देण्यासंदर्भातील आदेश निर्गमित करण्यापूर्वी लादावयाच्या प्रस्तावित शिक्षेबाबत अभिवेदन सादर करण्याची संधी देण्याची तरतूद उपरोक्त नियमात करण्यात आली आहे. त्यानुसार शासन आता असे आदेश देत आहे की, प्रस्तावित शिक्षा लादण्यापूर्वी शिक्षेबाबत अभिवेदन सादर करण्याची संधी शासकीय कर्मचाऱ्यास देण्यात यावी, या मर्यादेपर्यंत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीडीआर-१०८२/३३६२/६९/अकरा, दिनांक १२ जून १९८६ मधील सूचना सुधारण्यात आल्या आहेत, असे समजण्यात यावे.

४. शासनाच्या असेही निदर्शनास आणण्यात आले आहे की, एका प्रकरणात शासकीय कर्मचाऱ्यास न्यायालयाने दोषी ठरविल्यानंतर संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास शासन सेवेतून पूर्वलक्षी प्रभावाने बडतर्फ करण्यात आले. शासकीय कर्मचाऱ्यास पूर्वलक्षी प्रभावाने बडतर्फ करणे कायद्यानुसार बरोबर नाही. म्हणून शासन असे आदेश देत आहे की, शासन सेवेतून कमी करण्याचे अथवा बडतर्फ करण्याचे आदेश ते संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास मिळाल्याच्या दिनांकापासून परिणामकारक होतील. आणि शिक्षेचे इतर आदेश, ते निर्गमित केल्याच्या दिनांकापासून परिणामकारक होतील.

५. ह्या आदेशाची इंग्रजी प्रत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अ. ग. संझगे,**
उप सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

**Confidential**

*Action to be taken in cases where Government Servants are convicted on criminal charges—*

GOVERNMENT OF MAHARASHTRA

GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

No. CDR-1092/662/CR-44/92/XI

Mantralaya, Bombay 400 032, dated the 29th December 1992.

## *CIRCULAR*

Government has issued detailed guidelines in G.C., G.A.D., No. CDR-1082/3362/69/XI, dated the 12th June 1986 for taking action against Government servants convicted in criminal charges. It has been clearly laid down that in a case where a Government servant has been convicted in a court of law of an offence which is such as to render further retention in public service of the Government servant prima facie undesirable, action to dismiss, remove or retire him compulsorily from service should be taken, without waiting for the period of filing an appeal or if an appeal has been filed, without waiting for the decision in the first court of appeal. However, it has been brought to the notice of the Government that these instructions are not being scrupulously followed with the result the Government servants are being granted subsistence allowance at the normal rate even after their conviction awaiting the decision in the first court of appeal. The Government is the loser as many a time it has to pay to the Government servants, subsistence allowance, (many a time) at an enhanced rate which may be equal to 80 to 85 percent of their emoluments, without utilising their services.

2. In respect of those cases where it is found that the competent authorities have not followed the instructions issued in G.C., G.A.D. No. CDR-1082/3362/69/XI, dated the 12th June 1986, a serious note of the lapses of such authorities should be taken. Similarly, whenever a supervisory authority finds at the time of normal inspection, that the instructions contained in the above circular are not followed by the disciplinary authority, it should also take a serious note of the lapses of the concerned disciplinary authority and take suitable action.

3. In the said circular it has also been laid down that it is not necessary to issue any show-cause notice to the Government servant before imposing penalty on him. Rule 13(*i*) of the M.C.S. (D. and A.) Rules, 1979 has been amended *vide* G. N. No. CDR-1188/1582/CR-38/88/XI, dated the 12th October 1990 providing for giving an opportunity of making representation on the penalty proposed to be imposed before any order is made. The Government is, therefore, pleased to direct that the instructions issued in G.C., G.A.D., No. CDR-1082/3362/69/XI, dated the 12th June 1986 should be treated as modified to the extent that an opportunity of making representation should be given on the penalty proposed to be imposed before any order is made.

4. It has also been brought to the notice of the Government that in respect of a case, where Government servant was convicted by a court, the concerned Government servant was dismissed from Government service with retrospective effect. It is not legally correct to dismiss a Government servant with retrospective effect. Government is, therefore, pleased to direct that an order of removal or dismissal from service should take effect from the date of its actual receipt by the Government servant concerned and other orders of punishment become effective from the date when they are sent out.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. G. MANDPE,
Deputy Secretary to Government,
General Administration Department.

To,

The Sectretary to the Governor,
The Secretary to the Chief Minister,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Konkan Division, Bombay,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Pune Division, Pune,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Nashik Division, Nashik,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Aurangabad Division, Aurangabad,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Amravati Division, Amravati,
The Regional Special Officer, Departmental Enquiries, Nagpur Division, Nagpur,
All Divisional Commissioners,
All Collectors,
All Heads of Departments and Heads of Offices under the Administrative Control of Mantralaya Departments,
All District Enquiry Officers,
All Desks in General Administration Department,
All Mantralaya Departments,
Select file.